**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तांत्रिक) या संवर्गातील श्री. स्वानंद धनंजय देवधर, मुख्याद्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, राधानगरी, जिल्हा कोल्हापूर यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

**शासन आदेश क्र. परिवि-२०२२/प्र.क्र.६५ /व्यशि-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मुख्य इमारत, दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ एप्रिल, २०२२.

**संदर्भ**:- (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि २७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९.२.२०१६.

(२) कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या क्र.व्यशिअ-२०१५/प्र.क्र.३७७/व्यशि-१, दि.३१.८.२०१६

**प्रस्तावना:-**

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तां.) या संवर्गातील श्री. स्वानंद धनंजय देवधर, मुख्याद्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, राधानगरी, जिल्हा कोल्हापूर यांची दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरिता संदर्भ क्र.(२) येथील आदेशान्वये या विभागाच्या दि.३१.८.२०१६ रोजीच्या शासन आदेशान्वये प्रथम नियुक्ती करण्यात आली होती.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तां.) या संवर्गातील श्री.देवधर यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने, त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

श्री. स्वानंद धनंजय देवधर, मुख्याद्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, राधानगरी, जिल्हा कोल्हापूर यांनी परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केल्या असल्याने, त्यांचा परिविक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील पुढील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ येथे नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याच्या दिनांक स्तंभ क्र.६ येथे नमूद करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नाव व पदनाम | रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलण्याचे कारण | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक. |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री.स्वानंद धनंजय देवधर, शा.तां.वि. राधानगरी, जिल्हा कोल्हापूर | दि.१५/३/२०१७ | निरंक | दि.१४/३/२०१९ | दि.१५/३/२०१९ |

**२.** संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर अधिकाऱ्याच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार तात्काळ उचित कार्यवाही करावी.

**३.** सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि २७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९.२.२०१६ मधील तरतुदीन्वये व शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दि.२५.८.२०१५ व अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०४०७१७४६१३०८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2022.04.07 17:47:25 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२, महाराष्ट्र /नागपूर.
३) महालेखापाल, लेखा परीक्षा व अनुज्ञेयता, १/२, महाराष्ट्र /नागपूर.
४) सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
६) संबंधित अधिकारी.
७) निवडनस्ती.